**श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत ११ रस्ते विकास प्रकल्पाच्या भूसंपादनासाठीची रक्कम शिर्डी नगरपंचायतीकडे वर्ग करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय क्र. सासंवि -२०१६/८७६/प्र.क्र.१३१/का.१६**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०७ सप्टेंबर, २०१८.

**संदर्भ:-** १) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.०४.०९.२०१४
२) विधि व न्याय विभाग, शासन निर्णय समक्रमांक दि.०८.०६.२०१७
३) मुख्य कार्यकारी अधिकारी,श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था,शिर्डी यांचे पत्र क्र.एसएसएसटी/बांधकाम/१३३५/२०१८,दि.१५.०६.२०१८

**प्रस्तावना:-**

संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ दि.०४.०९.२०१४ अन्वये श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत प्रथम प्राधान्य गटातील ११ रस्त्यांच्या विकासासाठी आवश्यक असलेल्या भूसंपादन व इतर अनुषंगिक खर्चासाठी रु.८८ कोटी इतक्या सुधारित खर्चाच्या अंदाजपत्रकास कार्योत्तर मान्यता देण्यात आली. तसेच संदर्भाधीन शासन निर्णय क्र.२, दि.०८.०६.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये या रस्त्यांच्या विकासासाठी प्रलंबित न्यायालयीन दाव्यातील निर्णयानुसार भूसंपादन व इतर अनुषंगिक खर्चासाठी होणाऱ्या रु.३०,७५,३३,१४५/- इतक्या वाढीव खर्चास मान्यता देण्यात आली. संदर्भाधीन क्र.३ शिर्डी संस्थानच्या दि.१५.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये भूसंपादनाचा निधी भूसंपादन अधिकारी तथा उप विभागीय अधिकारी, शिर्डी भाग, शिर्डी यांच्याकडे वर्ग केला असता प्रस्तुत प्रकरणी भूसंपादन संस्थान शिर्डी नगरपंचायत असल्याने सदर निधी नगरपंचायतीमार्फत वर्ग करावा, असे नमूद करुन निधी परत केला असल्यामुळे, भूसंपादनाचा उर्वरित निधी संस्थानामार्फत नगरपंचायतीकडे वर्ग करुन त्यांच्यामार्फत भूसंपादन अधिकाऱ्याकडे वर्ग करण्यास मान्यता मिळावी, अशी विनंती केली आहे. संदर्भाधीन शासन निर्णय क्र.१ व २ अन्वये या ११ रस्त्यांच्या प्रकल्पाच्या भूसंपादनासाठी मंजुर केलेल्या एकूण रु.११८,७५,३३,१४५/- या निधीतून भूसंपादनाचा उर्वरित निधी नगरपंचायतीकडे वर्ग करुन त्यांच्यामार्फत भूसंपादन अधिकाऱ्याकडे वर्ग करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय:-</u>**

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी यांच्यामार्फत शिर्डीमधील ११ रस्त्यांच्या भूसंपादन व इतर अनुषंगिक खर्च तसेच या रस्त्याच्या भूसंपादनासाठी न्यायालयीन दाव्यानुसार देय होणाऱ्या वाढीव खर्चासाठी मंजुर केलेल्या एकूण रु.११८,७५,३३,१४५/- या निधीमधून रु.३४,३८,८१,७०१/- इतका भूसंपादनाचा उर्वरित निधी संस्थानामार्फत नगरपंचायतीकडे वर्ग करुन त्यांच्यामार्फत भूसंपादन अधिकाऱ्याकडे वर्ग करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था (शिर्डी) (सुधारणा) अधिनियम,२००४ च्या कलम २१ (२)(दोन) मधील तरतुदीनुसार शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्यांचा संकेतांक २०१८०९१११५५७१८८७१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Salunke Sunita Parag
Date: 2018.09.11 16:01:39 +05'30'

**( सु.प.साळुंके )**
**कार्यासन अधिकारी, विधि व न्याय विभाग.**

**प्रति:-** १) मा. अध्यक्ष, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर,

२) मुख्य कार्यकारी अधिकारी, श्री साईबाबा संस्थान विश्वस्तव्यवस्था, शिर्डी, जि.अहमदनगर,

३) निवड नस्ती/का.१६.